# व्लादीमिर मायकोव्स्की



# पानोपानी प्राणीच प्राणी

# व्लादीमिर मायकोव्स्की

# पानोपानी प्राणीच प्राणी

चित्रे: निकिता चारुशीन
अनुवाद: अनिल हवालदार




प्रगती प्रकाशन

मॉस्को




लोकवाङ्मय गृह प्रा. लि.

मुंबई



उघडा दार पानाचे
संमेलन पुस्तकात प्राण्यांचे.



सिंह दाखवतो तुम्हा
ध्यान देऊन नीट बघा,
नाही आता राजा जनावरांचा
केवळ अध्यक्ष या पुस्तकाचा.

प्राण्याला ह्या म्हणतात लामा
लामा मुलगी
नि आई लामा.



छोटुकला हा पेलिकन
अन् हा मोठ्ठा पेलिकन.





ही वात्रट झेब्रा मादी
अंगावर हिच्या
पट्ट्यापट्ट्यांची गादी !

आपल्या पुस्तकात थेट आली
हत्ती, हत्तीण नि त्यांची बाळे.
उंची त्यांची दोन-तीन मजले
दोन कान जणू दोन मोठे थाळे,
शेपूट पुढती जिथे तोंड
म्हणतात तिला हत्तीची "सोंड"
अहो पांढरे काय ते सोंडेखालती
चेष्टा नको राव, ते सुळे हस्तीदंती.



खायला मणभर प्यायला हौदभर
कपडे शिवायला कापड मैलभर!
यांची बाळे लंबू एवढी
आमच्या बाबांच्या उंचीएवढी.



जागा द्या जागा द्या हत्तीला
मुंडी मनसोक्त डोलवायला.
एक पान नाही पुरत मावायला,
दोन पाने सलग द्या पसरायला!

सुसरबाई! पोरांना भरते धडकी.
उगाच डिवचू नका तिला,
पाण्यात निवांत पडू दे तिला,
नजरेआडच बरा हा मामला!



उंट बघा हा उंट बघा,
लादून ओझी त्याच्या पाठी
लोक निघतात प्रवासासाठी.



ओसाड वाळवंटी राहतो,
बेचव काटेरी-पाला खातो,
वर्षाचे महिने बारा राबतो
ओझ्याचे जनावर हा ठरतो!



कांगारू
दिसते खूप गंमतीचे.
हात त्याचे निम्मे थोटे
म्हणून पाय झाले दुप्पट मोठे!

लांबमान्या जिराफला
काही केल्या नाही सापडत
मापाची कॉलर गळ्यात अडकवायला.
जिराफच्या पोरांची मात्र मज्जाच मज्जा :
जिराफांच्या आईला
आहे भरपूर मान
बाळांना मिठ्या घालून खेळायला.





माकड हे
अतिविनोदी.
बैठक अशी जणू पुतळा!
नसती जर ही शेपटी त्याला
माणूस समजून झाला असता घोटाळा!

ऊष्ण प्रदेशातला मूळचा हा गडी
हिवाळी थंडीत याची वळते बोबडी.





भल्या प्राण्यांनो,
मजा खूप आली,
घरी जायची आता वेळ झाली!

